**सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ कार्यालयातील नियमित आस्थापनेवरील गट-ड संवर्गातील सर्व पदांना गट-क संवर्गात पदोन्नती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१९/प्र.क्र.३२/सेवा-४,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- ०४ डिसेंबर २०१९.

<u>वाचा</u>: १) सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्रमांक:एसआरव्ही २०१४/क्र.३२२/ का.१२ दिनांक ६ जून २०१७,
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्रमांक:आरटीआर २०१४/प्र.क्र.३५५/का.१२ दिनांक ६ जून २०१७,

**<u>प्रस्तावना:</u>**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ १ येथील दि.०६ जून, २०१७ च्या अधिसूचने अन्वये महाराष्ट्र शासनाच्या विभागातील व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील गट-ड संवर्गाचे सेवाप्रवेश नियम तयार करण्यात आले आहेत. जसे सफाईगार, स्वच्छक, संदेशवाहक, सहायक दारवान, उद्वाहन चालक, चोपदार, जमादार, इत्यादी. सदर अनुसूचीचे अवलोकन केले असता असे दिसून येते की, सदर अनुसूची मध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ क्षेत्रीय कार्यालयांअंतर्गत असलेली गट-ड संवर्गातील पदे जसे खानसामा, माळी, सफाई कामगार, कक्ष सेवक, चौकीदार इत्यादी पदांचा उल्लेख नाही.

२. लिपिक-टंकलेखक, गट-क या संवर्गाबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ६ जून, २०१७, दिनांक २१.२.२०१८ व दि.११.६.२०१९ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार, या विभागाच्या अधिनस्थ क्षेत्रीय कार्यालयातील गट-ड संवर्गात ३ वर्षे सेवा पूर्ण केलेल्या, विहित शैक्षणिक अर्हता धारण केलेल्या तसेच मराठी-इंग्रजी टंकलेखनाची विहित परिक्षा उत्तीर्ण केलेल्या कर्मचा-यांचे गट-क संवर्गामध्ये पदोन्नती देण्याबाबतचे विनंती अर्ज शासनास प्राप्त झाले आहेत.

३. तरूण वर्गास त्यांच्या शिक्षणास अनुसरुन रोजगाराच्या संधी उपलब्ध होणे तसेच शासनातील माहिती व तंत्रज्ञानाचा अधिक वापर पाहता, शासनाच्या विभागातील उपलब्ध मनुष्यबळाच्या संरचनेत काळानुरुप बदल होणे आवश्यक झाले आहे.

४. सहाव्या केंद्रीय वेतन आयोगाने अशी शिफारस केली आहे की, गट-ड मधील कर्मचाऱ्यांच्या गट-क मधील श्रेणीवर्धनासाठी विहित शैक्षणिक अर्हता धारण करणाऱ्या कर्मचाऱ्यांना, कनिष्ठ लिपिकासारख्या पदावर सामावून घेणे निश्चितच उचित ठरेल. सहाव्या वेतन आयोगाची शिफारस, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ गट-ड मधील कर्मचा-यांची पदोन्नती मिळणेबाबतची निवेदने, गट-ड मधील कर्मचाऱ्यांना अधिकची संधी देण्याची गरज, शासनाच्या कार्यपध्दतीतील माहिती तंत्रज्ञान व ई-ऑफीस प्रणालीचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाच्या परिणामकारक वापराची आवश्यकता विचारात घेऊन, कनिष्ठ लिपिक संवर्गातील रिक्त पदांवर पदोन्नतीने कर्मचारी वर्ग उपलब्ध करुन दिल्यास, विभागाला कुशल मनुष्यबळ प्राप्त होण्याच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ कार्यालयातील **नियमित आस्थापनेवरील** गट -**ड** मधील जे कर्मचारी गट-क मधील लिपिक-टंकलेखक/कनिष्ठ लिपिक पदासाठी विहित पात्रता धारण करीत असल्यास, अशा कर्मचा-यांना लिपिक-टंकलेखक/कनिष्ठ लिपिक पदावर पदोन्नती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ क्षेत्रीय कार्यालयातील **नियमित आस्थापनेवरील गट-ड** म्हणून घोषित केलेल्या सर्व पदांना सामान्य प्रशासन विभागाची, शासन अधिसूचना क्रमांक:एसआरव्ही २०१४/ प्र.क्र.३२२/का.१२ दिनांक ६ जून, २०१७ लागू करण्यात येत आहे.

२. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ क्षेत्रीय कार्यालयातील **नियमित आस्थापनेवरील गट-ड** म्हणून घोषित केलेल्या सर्व पदांना लिपिक-टंकलेखक/कनिष्ठ लिपिक या संवर्गाच्या सामान्य प्रशासन विभागाच्या शासन अधिसूचना, क्रमांक: आरटीआर २०१४/प्र.क्र.३५५/का.१२ दिनांक ६ जून, २०१७ मध्ये विहित केलेल्या पदोन्नती कोट्यामध्ये पदोन्नती देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर पदोन्नतीकरिता गट-ड संवर्गातील कर्मचा-यांनी, सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त दिनांक ६ जून, २०१७ रोजीच्या शासन अधिसूचनेमधील नियम ३(क) अन्वये लिपिक टंकलेखक/कनिष्ठ लिपिक पदासाठी विहित केलेली अर्हता धारण करणे आवश्यक आहे.

३. सदर शासन निर्णय, समान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२८८४/का.१२, दिनांक २६.९.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिद्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१९१२०४१३०१३६३७१८ असा आहे. सदर शासन निर्णय, डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VAISHALI MANISH SULE

Digitally signed by VAISHALI MANISH SULE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=0e39186eb174ffc2d5d67d71804bf385073457ed31869
70cc74a272f3074c496, postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=cacc4e5906a45e67bca76eac2f10992fbf69020ed4
ea4e45fa58b2a72eef683f, ou=PUBLIC WORKS, o=GOVERNMENT
OF MAHARASHTRA, cn=VAISHALI MANISH SULE
Date: 2019.12.04 13:04:20 +05'30'

**( वैशाली सुळे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव(सा.बां.), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई-३२,
२) सचिव(रस्ते), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई-३२,
३) सचिव(बांधकामे), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२,
४) महालेखापाल-१/२(लेखापरिक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर,
५) महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर,
६) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, (मुंबई/कोकण/पुणे/नाशिक/नागपूर/औरंगाबाद/अमरावती),
७) मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
८) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग,मुंबई,
९) मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
१०) सर्व सहसचिव व उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
११) अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), मुंबई,
१२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळे, (मुंबई/पुणे/नाशिक/नागपूर/औरंगाबाद/अमरावती)
१३) सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळे,

१४) संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,

१५) कार्यासन-१२,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई,

१६) प्रशासन-१ /रो.आ.१/रो.आ.२ कार्यासने, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई,

१७) कार्यासन (सेवा-४), निवडनस्ती.